मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अधिकारी/ कर्मचारी यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२१/प्र.क्र.८७/प्रशासन-१**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- १४ डिसेंबर, २०२१**

संदर्भ : १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२०
३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्र.ईएसटी-२०२१/प्र.क्र.९५/प्रशासन-१, दि.२९ सप्टेंबर, २०२०.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०१८/ प्र.क्र.३०८/ १६-ब दि.२७ नोव्हेंबर, २०२०
५) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्र.ईएसटी-२०२१/प्र.क्र.९५/प्रशासन-१, दि.२२ एप्रिल, २०२१.
६) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०१८/ प्र.क्र.३०८/ १६-ब दि.२८ ऑक्टोबर, २०२१
७) मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांचे क्र.मु.अ.(वि)/ का-१/१७९४/सन २०२१, दि.२६ ऑक्टोबर, २०२१ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना -:**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि. २१ डिसेंबर, २०१९ मधील तरतुदीनुसार, अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याच्या कारणास्तव अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणा-या अधिकारी व कर्मचा-यांच्या संख्येइतकी, असे अधिकारी व कर्मचारी सध्या ज्या पदावर कार्यरत असतील त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करण्याबाबत तसेच उपरोक्त नमूद सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयापूर्वी, अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्याने सेवामुक्त करण्यात आलेले अधिकारी व कर्मचारी यांच्या सेवा समाप्ती पूर्वी ते ज्या पदावर कार्यरत होते, त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करून त्यांना मानवतावादी दृष्टीकोनातून व प्रशासनाची होणारी अडचण दूर करण्यासाठी सर्व प्रशासकीय विभागांनी तात्पुरत्या स्वरूपात अकरा महिन्यांकरिता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदावर नेमणूक देणेबाबत निर्देश देण्यात आले आहे.

तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि. ३० जून, २०२० अन्वये सदर अधिसंख्य पदे निर्माण करण्याचे प्राधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, दि.२९ सप्टेंबर, २०२० अन्वये मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई या कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांच्याकरीता अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली आहेत. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२७ नोव्हेंबर, २०२० अन्वये अधिसंख्य पदांस मुदतवाढ देण्यात आली होती. त्यासअनुसरुन या विभागाच्या दि.२२ एप्रिल, २०२१ च्या शासन निर्णयान्वये सदर अधिसंख्य पदांस मुदतवाढ देण्यात आली होती. सदर अधिसंख्य पदाची मुदत दि.३१ ऑक्टोबर, २०२१ रोजी समाप्त झाली असल्याने त्यांना दि.०१ नोव्हेंबर, २०२१ पासून पुढे मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आता या शासन निर्णयान्वये मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या अधिपत्याखाली कार्यरत असलेल्या सोबत नमूद **प्रपत्र-अ व प्रपत्र-ब** मधील अधिकारी/ कर्मचारी यांना दिनांक ०१ नोव्हेंबर, २०२१ पासून ते दिनांक ३० सप्टेंबर, २०२२ पर्यंत तात्पुरत्या स्वरूपात ११ महिन्यांकरिता किंवा सदर कर्मचारी सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. प्रपत्र-अ व प्रपत्र-ब मध्ये नमूद अधिकारी/कर्मचारी सद्य:स्थितीत मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असल्याने त्यांच्या वेतनावर होणारा खर्च त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधिच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. बीसीसी २०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९ व क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२० तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. बीसीसी २०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२७ नोव्हेंबर, २०२० व दि.२८ ऑक्टोबर, २०२१ आणि सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.ईएसटी २०१९/ प्र.क्र.९५/ प्रशासन-१, दि.२९ सप्टेंबर, २०२० व दि.२२ एप्रिल,२०२१ या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११२१४११३२०३९३१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2021.12.14 11:34:28 +05'30'

**( वि.नि.ढमाळ )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

२. सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४००० ३२.
३. प्र. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५. महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग,बांधकाम भवन, मर्झबान पथ, मुंबई-४०००01.
७. अधिदान व लेखा अधिकारी, वान्द्रे (पूर्व), मुंबई.
८. कार्यासन सेवा-२/सेवा-३ / सेवा-४/अर्थसंकल्प -३, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. कार्यासन प्रशासन-१, सार्वजनिक बांधकाम विभाग, (निवडनस्ती)

**सार्वजनिक बांधकाम विभाग , शासन निर्णय क्रमांक ईएसटी -२०२१/प्र.क्र.८७/प्रशा-१**
**दिनांक १४ डिसेंबर, २०२१ सोबतचे सहपत्र**

**(प्रपत्र-अ)**

मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या अंतर्गतच्या अधिकारी / कर्मचारी यांनी अनुसूचित जमातीचे जातवैधता प्रमाणपत्र सादर न केल्याच्या कारणास्तव निर्माण केलेल्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ द्यावयाची पदे.

| अ.क्र. | अधिकारी / कर्मचाऱ्याचे नाव | पदनाम | नियुक्तीचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात आल्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.सतिश रामभाऊ वाघ | शाखा अभियंता | २६/१२/१९८९ | ३१/१२/२०२७ | ३१/१२/२०१९ |
| २ | श्री.विनोद खुशालराव वरुडकर | स.अ.श्रेणी-२ | १७/११/१९९८ | ३१/१२/२०२८ | २६/०५/२०२० |
| ३ | श्री.रविंद्र विठ्ठल काटवे | तारतंत्री | १४/१२/१९८९ | ३०/०६/२०२७ | ३१/१२/२०१९ |
| ४ | श्री.हरिश्चंद्र लखमा गुणाजी | वरीष्ठ लिपिक | १२/१२/१९८९ | ३१/०५/२०२३ | ३१/१२/२०१९ |
| ५ | श्री.कमलेश ना. निखारे | वरीष्ठ लिपिक | १६/०४/१९८५ | ३०/११/२०२२ | ३१/१२/२०१९ |
| ६ | श्री.हरिश्चंद्र दौलत बुरडे | कनिष्ठ लिपिक | २९/०७/१९९१ | ३०/०९/२०२५ | ३१/१२/२०१९ |
| ७ | श्री.सुंदर महादेव होके | कनिष्ठ लिपिक | ०३/०१/१९९६ | २८/०२/२०२८ | ३१/१२/२०१९ |
| ८ | श्री.रमाकांत तातोबा पारधे | शिपाई | १३/१२/१९८९ | ३०/०६/२०२२ | ३१/१२/२०१९ |
| ९ | श्री.पांडुरंग गो. दोरकुळकर | पंपपरिचर | १६/०७/१९९० | ३१/०५/२०२८ | ३१/१२/२०१९ |
| १० | श्री.नाना देवराम सोनवणे | मजदूर | ०९/१०/१९९१ | ३१/०५/२०२५ | ३१/१२/२०१९ |

## सार्वजनिक बांधकाम विभाग , शासन निर्णय क्रमांक ईएसटी -२०२१/प्र.क्र.८७/प्रशा-१

## दिनांक १४ डिसेंबर ,२०२१ सोबतचे सहपत्र

### (प्रपत्र-ब)

मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या अंतर्गतच्या अधिकारी/कर्मचारी यांनी अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याच्या कारणास्तव यापूर्वी सेवा समाप्त करण्यात आल्याने त्यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेली अधिसंख्य पदांना मुदतवाढ द्यावयाची पदे.

| अ.क्र. | अधिकारी / कर्मचाऱ्याचे नाव | पदनाम | नियुक्तीचा दिनांक | सेवा समाप्त करण्यात आल्याचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात आल्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.अवधूत ज्ञानेश्वर लडगे | कनिष्ठ अभियंता | १९/१२/२००३ | ३१/०८/२०१० | ३०/०९/२०३८ | ३१/१२/२०१९ |
| २ | श्री.प्रदिपसिंग छ.चंदेल | अनुरेखक | २५/०३/१९८७ | ३१/०७/२०१७ | ३१/०१/२०२२ | ३१/१२/२०१९ |
| ३ | श्री.अजय राजेश्वर नंदनवार | मजदूर | १७/०५/२००३ | ०५/०१/२००७ | ३०/०६/२०३७ | ०६/०२/२०२० |